केंद्र पुरस्कृत “मिशन शक्ती” या योजनेतील “संबल” या उपयोजनेंतर्गत “वन स्टॉप सेंटर” (One Stop Centre) ही घटक योजना राबविण्यास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- वस्टॉसें २०२३/प्र.क्र.२६/कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - १२ मे, २०२३.

**वाचा:-**

१) सह सचिव, केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अ.शा.पत्र क्र.WW २३/१/२०२१-WW, दि.१४.०७.२०२२,
२) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.३०७/कार्या-२, दि.०३.०१.२०२३,
३) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआपु/मवि/मिशनशक्ती/HEW/२०२२-२३/७०४६, दि.०८.१२.२०२२,
४) अवर सचिव, केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.२२०११/१/२०२२-WW, दि.१६.१२.२०२२,
५) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१०/२०१७/का-१४१४, दि.०२.०८.२०१७.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासन पुरस्कृत “मिशन शक्ती” या योजनेच्या केंद्र शासनाने वाचा येथील दि.१४.०७.२०२२ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना सन २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून वाचा क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये राज्यात लागू करण्यात आल्या आहेत. केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालयाने “वन स्टॉप सेंटर” योजनेबाबत माहे डिसेंबर, २०१७ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार सद्यस्थितीत राज्यातील सर्व ३६ जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी एक (पुणे जिल्ह्यासाठी २) असे एकूण ३७ “वन स्टॉप सेंटर्स” सुरु आहेत.

सध्यस्थितीत राज्यात सुरु असलेली ३७ “वन स्टॉप सेंटर्स” आणि वरील वाचा क्र.४ येथील केंद्र शासनाच्या पत्रान्वये राज्यातील मोठ्या प्रमाणात लोकसंख्या असलेल्या मुंबई उपनगर, औरंगाबाद, नाशिक, नागपुर व ठाणे या शहरांसाठी प्रत्येकी एक अशी पाच अतिरिक्त “वन स्टॉप सेंटर्स” सुरु करण्यासाठी मान्यता प्राप्त झाली आहे. केंद्र शासनाच्या “मिशन शक्ती” या योजनेच्या “संबल” उपयोजनेतंर्गत “वन स्टॉप सेंटर” ही घटक योजना केंद्र शासनाच्या १०० टक्के हिस्स्याच्या प्रमाणात राज्यात लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

केंद्र शासन पुरस्कृत “मिशन शक्ती” या एकछत्री योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार सद्यस्थितीत राज्यात सर्व जिल्ह्यांमध्ये सुरु असलेले ३७ “वन स्टॉप सेंटर्स” आणि केंद्र शासनाच्या दि.१६.१२.२०२२ च्या पत्रान्वये मान्यता प्राप्त झालेल्या मुंबई उपनगर, औरंगाबाद, नाशिक, नागपूर व ठाणे या पाच जिल्ह्यांसाठी प्रत्येकी एक, अशी एकूण ४२ “वन स्टॉप सेंटर्स” “संबल” या उपयोजनेचा “वन स्टॉप सेंटर” या घटक योजनेंतर्गत सुरु करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

**१) <u>योजनेचे ध्येयः-</u>**

“वन स्टॉप सेंटर” ही घटक योजना “संबल” या उपयोजनेचा तसेच, जिल्हास्तरावरील सर्व उपक्रमांचा मुख्य आधार असेल. संकटग्रस्त महिलांना खाजगी आणि सार्वजनिक अशा दोन्ही ठिकाणी एकाच छताखाली मदत देणे आणि आपत्कालीन तसेच, गैर-आपत्कालीन स्थितींमध्ये वैद्यकीय, कायदेशीर सुविधा, तात्पुरता निवारा, पोलिस सहाय्य, कोणत्याही प्रकारच्या हिंसेविरोधात लढण्याकरिता मानसशास्त्रीय आणि सामुपदेशिक आधार यांसारख्या सुविधा तात्काळ उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने “वन स्टॉप सेंटर” ही घटक योजना दि.१ एप्रिल, २०१५ पासून राबविण्यात येत आहे.

मानसिक छळ किंवा इतर कोणत्याही संकटग्रस्त महिलांना मदत करण्यासाठी संस्थात्मक/समूहबध्द, मनोसामाजिक/कायदेशीर समुपदेशकांमार्फत सहाय्य करता यावे, म्हणून “वन स्टॉप सेंटर्स” वाढवली जाणार आहेत. महिलांच्या विकासासाठी आणि सबलीकरणासाठी ही “वन स्टॉप सेंटर्स” महिलांना त्यांच्या (आर्थिक आणि सामाजिक) आवश्यकतेनुसार राज्य/जिल्हा स्तरावरील केंद्रांमार्फत सरकारी योजना/उपक्रमांशी जोडण्याचे कार्य करतील. त्याचप्रमाणे ही “वन स्टॉप सेंटर्स” राज्य/जिल्हा स्तरावरील/ मंत्रालयाच्या विविध कायद्यांअंतर्गत येणाऱ्या वैधानिक अधिकाऱ्यांची नोंद ठेवतील आणि आवश्यकतेनुसार त्यांच्याशी संपर्क करतील. “वन स्टॉप सेंटर्स” हे गृहिणी, व्यावसायिक महिला यांना कायदेशीर मदत आणि मनोसामाजिक समुपदेशन पुरवून “शक्ती सदन” साठी एका दुव्याप्रमाणेही काम करतील.

महिला हेल्पलाइन्स, मानवी तस्करी विरोधी तुकड्या (AHTUs), महिला मदत डेस्क (WHDs) आणि जलद सेवेची विशेष न्यायालये (FTSCS), जिल्हा विधी सेवा प्राधिकरण (DLSA), इ. तसेच, निर्भया निधी अंतर्गत येणाऱ्या इतर उपक्रमांशी समन्वय आणि एकीकरणासाठी “वन स्टॉप सेंटर्स” मंत्रालयाची जिल्हा स्तरावरील मुख्य केंद्रे असतील.

**२) <u>“वन स्टॉप सेंटर” केंद्राचे कार्यः-</u>**

राज्यातील संकटग्रस्त, काळजी व संरक्षणाची गरज असलेल्या पिडित महिलांना या केंद्रांमार्फत एकाच छताखाली मनौवैज्ञानिक आणि समुपदेशन, वैद्यकीय, पोलिस सहाय्य, तात्पुरता निवारा, कायदेविषयक सल्ला इ. सेवा देणे.

**३) <u>योजनेचे स्वरुपः-</u>**

१. आपत्कालीन आणि गैर आपत्कालीन परिस्थितीत राज्यातील अत्याचारग्रस्त तसेच संकटग्रस्त महिलांना या “वन स्टॉप सेंटर” चा लाभ मिळणार आहे.

२. संकटग्रस्त महिला त्यांच्या मुलांसह (सर्व वयोगटातील मुली आणि १२ वर्ष वयापर्यंतची मुले) जास्तीत जास्त ५ दिवसांकरिता "वन स्टॉप सेंटर" मध्ये तात्पुरता आश्रय घेऊ शकतात.

३. तात्पुरत्या निवाऱ्यासाठी महिलेची प्रवेश योग्यता नियमानुसार ठरविण्यात येईल. दीर्घकालीन निवाऱ्याची आवश्यकता असल्यास "वन स्टॉप सेंटर" कडून "शक्ती सदन" च्या सहयोगाने व्यवस्था केली जाईल.

४. १८ वर्षांखालील मुली सदर केंद्राच्या संपर्कात आल्यास त्यांना देखील, बाल न्याय (बालकांची काळजी आणि संरक्षण) कायदा २०१५ आणि लैंगिक अपराधापासून मुलांचे संरक्षण कायदा,२०१२ याअंतर्गत येणाऱ्या अधिकाऱ्यांशी/ संस्थांशी समन्वय साधून सेवा पुरवल्या जातील.

**४) <u>योजनेचा कालावधी :-</u>**

सदर योजनेचा कालावधी हा १५ व्या वित्त अयोगाचा कालावधी म्हणजे सन २०२५-२६ या आर्थिक वर्षापर्यंत असणार आहे.

**५) <u>योजनेची अंमलबजावणी:-</u>**

**<u>राज्य स्तर:</u>** - आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे.
**<u>जिल्हा स्तर:-</u>** संबंधित जिल्ह्यांचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी

**६) <u>योजनेचे व्यवस्थापन, संनियंत्रण व देखरेख समिती:-</u>**

**अ) <u>राज्यस्तरीय समिती:-</u>**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार सदर घटक योजनेच्या अंमलबजावणीसाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली "राज्यस्तरीय समिती" स्थापन करण्यात येईल.

**ब) <u>जिल्हास्तरीय समिती:-</u>**

सदर योजनेची जिल्हा स्तरावर संपूर्ण अंमलबजावणी जिल्हा दंडाधिकारी/जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीद्वारे केली जाईल. या समितीसंबंधीचे सर्व कामकाज जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालयाकडून केले जाईल. सदर समितीची रचना खालील प्रमाणे राहील:-

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३ | पोलीस अधीक्षक | सदस्य |
| ४ | पोलीस आयुक्तांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | सचिव, जिल्हा विधी सेवा प्राधिकारण, मुंबई | सदस्य |
| ६ | आयुक्त, महानगरपालीका/मुख्य कार्यकारी अधिकारी, नगरपालिका/ नगरपरिषद | सदस्य |
| ७ | जिल्हा शल्यचिकित्सक | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ८ | जिल्हा शिक्षणाधिकारी | सदस्य |
| ९ | प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय/ तंत्रनिकेतन | सदस्य |
| १० | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| ११ | जिल्हा कौषल्य विकास अधिकारी | सदस्य |
| १२ | जिल्हा उद्योग केंद्राचे प्रतिनिधी | सदस्य |
| १३ | जिल्हा क्रिडा अधिकारी | सदस्य |
| १४ | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण | सदस्य |
| १५ | प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास | सदस्य |
| १६ | सहाय्यक आयुक्त, दिव्यांग कल्याण | सदस्य |
| १७ | दोन नामनिर्देशीत सदस्य | सदस्य |
| १८ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | सदस्य सचिव |

सदर समिती योजनेच्या विविध घटकांतर्गत जिल्हा, गट आणि ग्राम पंचायत नगरपालिका प्रभागांसाठी वार्षिक कृती आराखडा तयार करेल. समितीची प्रत्येक तिमाहीत किमान एकदा बैठक घेण्यात येईल.

**(७) मनुष्यबळः-**

"वन स्टॉप सेंटर" या घटक योजनेंतर्गत काम करण्यासाठी कायमस्वरुपी कोणतीही पदे निर्माण करण्यात येणार नाहीत. या योजनेसाठी आवश्यक असलेले कंत्राटी मनुष्यबळ, त्यांची पात्रता व त्या अनुषंगिक इतर बाबी "मिशन शक्ती" या योजनेच्या मार्गदर्शक सुचनांमध्ये नमूद केल्यानुसार असतील. सर्व कर्मचारी करार पध्दतीने नियुक्त करण्यात येतील. तथापि, त्यांची नियुक्ती कामाचे वार्षिक मुल्यांकन समाधानकारक असण्याच्या अधीन असेल. या घटक योजनासाठी आवश्यक असलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची आयुक्तालय स्तरावरुन योग्य पध्दतीने निवड करण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना याद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

८) **अनुदानः-**

केंद्र शासनाच्या "मिशन शक्ती" या योजनेच्या "संबल" या उपयोजनेतील "वन स्टॉप सेंटर" या घटक योजनेसाठी केंद्र शासनाचा १०० टक्के हिस्सा असणार आहे. केंद्र शासनाने राज्यातील प्रत्येक "वन स्टॉप सेंटर" साठी खालील प्रमाणे निधीची तरतूद केलेली आहे:-

| A | Recurring | Amount Rs. |
|---|---|---|
| | One Stop Centre Management (Salary) 2.35 lakh pm including Empanelled Psycho and LegalAid for All Shelter Homes | 2820000/- |
| | Services to the Beneficieary (Food, Clothing & Medicine & Kit etc) One Stop Centre Admnistrative Cost (Starionary (Cartridge, Paper etc.), Electricity Telephone, Fax, Catering,Transport on hire, sanitary Napkin) | 489600/- |
| | Insurance @ 330 per person for 15 Staff | 59400/- |
| | Immediate Assistance, including for first aid to victims of rape. | 50000/- |
| | **Total-A** | **3419000/-** |

| | | |
|---|---|---|
| **B** | **Non-Recurring** | |
| | Repairing of Sakhi OSC functional for more than five years, subject to demand from respective State/ District | 200000/- |
| | Administration Cost (Refrigerator, Computor Peripherals, Telephone, Fax, Internet, Furnishing for the ward & other rooms, CCTV Camera & its installation etc/) | 265100/- |
| | Refurbishment of Pre-existing bulding for opening new OSC | 1000000/- |
| | Refurbishent Cost for OSCs to be set up in Constructed building. | 125000/- |
| | **Total-B** | **1590100/-** |
| **C** | **Construction Cost** | |
| | Construction of the Centre 150Sqm Builtup area. | 6000000/- |
| | **Total-C** | **6000000/-** |

**९) <u>निधी वितरणाची पध्दत:-</u>**

“मिशन शक्ती” या योजनेतील “संबल” या उपयोजनेतील “वन स्टॉप सेंटर”या घटक योजनेसाठी केंद्र शासनाचा १०० टक्के हिस्सा असणार आहे. “वन स्टॉप सेंटर” या घटक योजनेसाठी स्वतंत्रपणे उघडण्यात आलेल्या Single Nodal Agency या बँक खात्यात निधी हस्तांतरीत केला जाईल. राज्य स्तरावरुन संबंधित जिल्ह्यांना अनुदान हस्तांतरीत करण्यात येईल.

सदर योजनेसाठी जिल्हास्तरावर उघडण्यात आलेल्या स्वतंत्र खात्यामध्ये हा निधी जमा होईल. यासाठी पीएफएमएस या बँक खात्याला संलग्न असणे आवश्यक आहे. वेतन, मजुरी आणि सेवांसह इतर सर्व देयके केवळ पीएफएमएस खात्यामध्ये आगाऊ खर्च आणि हस्तांतरण (इएटी) मोडेलद्वारे केली जातील. यापूर्वी राज्य व जिल्ह्यांना वितरीत केलेले सर्व केंद्रीय अनुदान महिला व बाल विकास मंत्रालयाने निर्दिष्ट केलेल्या कालावधीत मिशन शक्तीसाठी उघडण्यात आलेल्या SNA खात्यांमध्ये हस्तांतरित करण्यात यावे.

**१०) “वन स्टॉप सेंटर” च्या बांधकामाबाबत:-**

i. नवीन “वन स्टॉप सेंटर” स्थापन करण्यासाठी, ज्या प्रस्तावांमध्ये स्वतंत्र प्रवेश व्यवस्थेसोबत किमान ५ खोल्या आणि १५० चौ.मी. चे चटई क्षेत्र असणारी, रुग्णालयीन/वैद्यकीय सुविधेच्या आत असणारी, ठळकपणे दृश्यमान आणि स्त्रियांना सहज उपलब्ध असणारी योग्य आणि पुरेशी निवास व्यवस्था असेल, त्यांना प्राधान्य देण्यात येईल.

ii. यासाठी रुग्णालयाच्या परिसरात किंवा परिसराबाहेर असलेली कर्मचारी निवासस्थाने देखील वापरली जाऊ शकतात.

iii. रुग्णालयीन/वैद्यकीय सुविधेच्या आत निवासस्थान शोधणे शक्य नसल्यास, स्वतंत्र प्रवेश व्यवस्थेसोबत पुरेशी निवास व्यवस्था असणाऱ्या, जिल्ह्यातील रुग्णालयीन/वैद्यकीय सुविधांपासून २ किमी च्या आत असलेल्या विद्यमान शासकीय/निमशासकीय संस्थेच्या प्रस्तावांचा विचार केला जाईल.

iv. तसेच, या उद्देशासाठी विचारात घेतला जाणारा पुढील पर्याय म्हणजे, जिथे रुग्णालयाच्या परिसरात किंवा रुग्णालयापासून २ किमी. अंतरावर दुसरे केंद्र नाही आणि शासनामार्फत याच

उद्देशासाठी जमीन देण्यात आली आहे तेथे "वन स्टॉप सेंटर" च्या बांधकामासाठी परवानगी देण्यात येईल.

v. "वन स्टॉप सेंटर" साठी राज्य शासनाद्वारे प्रमाणित किमान ३०० चौ.मी.च्या भुखंड क्षेत्रफळावर १५० चौ.मी. चे बांधकाम केले जाईल.

vi. पर्वतीय/अवघड ठिकाणी, जेथे ३०० चौ.मी. चे भूक्षेत्र निवडणे शक्य नाही, तेथे बांधकाम क्षेत्राशी तडजोड न करता, उभ्या विस्ताराच्या संधी लक्षात घेऊन, कमी आकाराच्या भूक्षेत्रावर केंद्र उभारण्याची परवानगी देण्यात येईल.

vii. तथापि, जिल्ह्यातील वर्तमान "वन स्टॉप सेंटर" पासून कमीतकमी ४० किमी अंतर असेल तरच, जिल्ह्यात दुसरे केंद्र उभारण्याची परवानगी दिली जाईल.

viii. या नियमातून मध्यवर्ती शहरे, जास्त लोकसंख्येची घनता असणारी शहरे/ गुन्हेगारीचे प्रमाण अधिक असणारी शहरे यांना, राज्य शासनाकडून औचित्य समोर आणले गेल्यास उपक्रम मान्यता मंडळाकडून सूट मिळू शकेल.

ix. महिलांबाबत होणाऱ्या गुन्ह्यांचे प्रमाण खूप जास्त आहे, परंतु पूर्वीपासून अस्तित्वात असणारी कोणतीही इमारत उपलब्ध नाही, अशाच ठिकाणी "वन स्टॉप सेंटर" च्या बांधकामाची परवानगी दिली जाईल.

उपरोक्त बाबींची तपासणी करुन केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी नवीन "वन स्टॉप सेंटर" चा परिपूर्ण प्रस्ताव (अंतर्भूत बाबीसह) संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाकडून तयार करुन घेऊन आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

२. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना या घटक योजनेचे राज्यस्तरावरील संनियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने वर्षातून किमान दोनदा आढावा घ्यावा.

३. "वन स्टॉप सेंटर" आणि "शक्ती सदन" साठी कायदेशीर, मानसशास्त्रीय, वैद्यकीय सुविधा यामधील आवश्यक कर्मचाऱ्यांचा सामाईक गट निर्माण करण्यात येईल. सदर गट जिल्ह्यांतर्गत सर्व दाखल प्रकरणांकरीता काम करेल. समुपदेशकांना त्यांच्या नियुक्तीनंतर सहा महिन्यांच्या कालावधीत शासनामार्फत अधिकृत घोषित करण्यात आलेल्या संस्थांद्वारे आयोजित होणारे प्रशिक्षण घेणे अनिवार्य राहील.

४. केंद्र शासनाच्या दि. १४.७.२०२२ मार्गदर्शक सुचनांनुसार "वन स्टॉप सेंटर" या घटक योजनेंतर्गत नमूद करण्यात आलेल्या सर्व सुविधा (Facilities/Amenities) पुरविणे आवश्यक राहील.

५. या योजनेअंतर्गत जिल्हा स्तरावर तसेच, योजनानिहाय वितरीत केलेल्या निधीचा विनियोग योग्य रितीने होत आहे किंवा कसे, याबाबत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी संनियंत्रण करुन प्रगतीचा त्रैमासिक अहवाल शासनास नियमित सादर करावा. तसेच, सदर घटक योजनेंतर्गत केंद्र शासनास

अनुदानाची मागणी करणे, उपयोगिता प्रमाणपत्रे, खर्चाची विवरणपत्रे, भौतिक/आर्थिक अहवाल सादर करणे इ. बाबत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे हे राज्य शासनास प्रस्ताव सादर करतील.

६. “मिशन शक्ती” या योजनेतील “संबल” या उपयोजनेअंतर्गत “वन स्टॉप सेंटर” ही घटक योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार राज्यात राबविण्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांची राहील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५१२१७३३३४०९३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHARAD LAXMAN AHIRE

Digitally signed by SHARAD LAXMAN AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b9bd688b9963b30401eb5b16e2839c534797f7c0241ad6e715d237585caf58e7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBEBC5BAAA1E92D127127B9EA6C25D4909188956D5D79D31FF8978B7BFD8FC57, cn=SHARAD LAXMAN AHIRE
Date: 2023.05.12 17:33:15 +05'30'

**(शरद अहिरे,**भा.प्र.से.**)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई,
५. मा.सभापती/उपसभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
७. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई,
१०.सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई,
११.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.प्रधान सचिव, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१४.विभागीय आयुक्त (सर्व) ,
१५.आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१६.आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,
१७.व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई,
१८. जिल्हाधिकारी (सर्व),

१९.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

२०.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,

२१.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

२२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२३.सह सचिव, उपसचिव, अवर सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४.सर्व सह आयुक्त/उप आयुक्त / विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,

२५.सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास,

२६.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,

२७.महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने),

२८. निवड नस्ती, कार्यासन-२.